**संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर असलेल्या मुख्यालय, मुंबई येथील ३१ अस्थायी पदांना मुदतवाढ.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डीपीपी-०२२०/प्र.क्र.३५/पोल-१०**
२ रा मजला, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मुंबई-४०० ०३२
दिनांक : २७ मार्च, २०२०

वाचा :

१. शासन निर्णय गृह विभाग क्रमांक एमआयएस-२००३/प्र.क्र.१४८/पोल-१०, दि.१२.१०.२०१०
२. शासन निर्णय गृह विभाग क्रमांक डीपीपी-२०१२/प्र.क्र.११२/पोल-१०, दि.२८.०५.२०१३
३. शासन निर्णय गृह विभाग क्रमांक डीपीपी-०११८/प्र.क्र.१४/पोल-१०, दि.२७.०३.२०१८
४. शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.०७.०९.२०१८
५. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. अस्थायी पदे/६७/१८५३/२०१८, दि.०६.०९.२०१८
६. शासन निर्णय गृह विभाग क्रमांक डीपीपी-०११८/प्र.क्र.१४/पोल-१०, दि.१६.१०.२०१८
७. शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.२१.०२.२०१९
८. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. अस्थायी पदे/६७/४१०/२०१९, दि.२७.०२.२०१९
९. शासन निर्णय गृह विभाग क्रमांक डीपीपी-०३१९/प्र.क्र.१०१/पोल-१०, दि.२०.०३.२०१९
१०. शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.११.०९.२०१९
११. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. अस्थायी पदे/६७/१९०३/२०१९, दि.१३.०९.२०१९
१२. शासन निर्णय गृह विभाग क्रमांक डीपीपी-१०१९/प्र.क्र.३१८/पोल-१०, दि.०५.१०.२०१९
१३. शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०
१४. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. अस्थायी पदे/६७/३४१/२०२०, दि.१०.०२.२०२०

**<u>शासन निर्णय</u> :-**

संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील एकूण ११६८ पदांचा आकृतीबंध मान्य करण्यात आलेला आहे. तसेच शासन निर्णय क्र:-डीपीपी-२०१२/ प्र.क्र.११२/ पोल-१०, दिनांक २८.०५.२०१३ नुसार संचालनालयाच्या आस्थापनेवर सहाय्यक सरकारी अभियोक्त्यांची २९९ पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर पदांचा आकृतीबंधात समावेश करण्याची कार्यवाही सुरु आहे. त्यापैकी संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर मुख्यालयात असलेल्या विविध संवर्गातील **३१ अस्थायी पदांना** शासन निर्णय गृह विभाग क्रमांक डीपीपी-१०१९/प्र.क्र.३१८/पोल-१०, दि.०५.१०.२०१९ अन्वये दिनांक २९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. आता सोबतच्या **परिशिष्ट- अ** मधील **३१ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२० ते दिनांक ३१.०८.२०२० पर्यंत**च्या मुदतवाढीस या आदेशान्वये शासन मंजुरी देत आहे. ही मुदतवाढ जी पदे सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त आहेत त्या पदांना लागू होणार नाही. तसेच, शासनाने सदरहू पदे नष्ट करण्याचे आदेश यापुर्वी दिलेले असतील, अशा पदांना मुदतवाढ लागू होणार नाही.

२. अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील पदांच्या आढाव्यास उच्च स्तरीय सचिव समितीने दिनांक १३.०१.२००५ रोजी मान्यता दिलेली असून, संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक १२.१०.२०१० च्या शासन निर्णय अन्वये उपरोक्त ११६८ पदांचा आकृतीबंध विहित करण्यात आलेला आहे. सदर आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे. तसेच शासन निर्णय क्र:-डीपीपी-२०१२/ प्र.क्र.११२/पोल-१०, दिनांक २८.०५.२०१३ नुसार संचालनालयाच्या आस्थापनेवर सहाय्यक सरकारी अभियोक्त्यांची २९९ पदे निर्माण करण्यात आली आहेत. सदर पदांचा आकृतीबंधात समावेश करण्याची कार्यवाही सुरु आहे.

३. यासाठी होणारा खर्च गृह विभाग बी-१, "२०१४-न्यायदान ११४-विधी सल्लागार व समुपदेशी, (००)(०१) संचालक सरकारी अभियोग संगणक संकेतांक क्रमांक २०१४ ००२९ ०१ वेतन" या लेखाशिर्षाखालील सन २०२०-२१ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यत यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/ प्र.क्र.८/ १६/ आपुक, दि.१२.०२.२०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३३०११३२१७२१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Neelam Girish Sangwai

Digitally signed by Neelam Girish Sangwai
DN: CN = Neelam Girish Sangwai, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2020.03.30 11:37:20 +05'30'

**( नीलम संगवई )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई
६. निवड नस्ती, गृह विभाग, पोल-१०.

## परिशिष्ट "अ"

सरकारी अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (मुख्यालय)

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहाय्यक संचालक (प्रशासन) | १ |
| २ | अतिरिक्त सरकारी अभियोक्ता | १ |
| ३ | सहाय्यक सरकारी अभियोक्ता | २ |
| ४ | लेखा अधिकारी | १ |
| ५ | प्रशासकीय अधिकारी | १ |
| ६ | निम्नश्रेणी लघुलेखक | ४ |
| ७ | वरिष्ठ लिपिक | ४ |
| ८ | लिपिक-टंकलेखक | १० |
| ९ | रोखपाल | १ |
| १० | वाहन चालक | १ |
| ११ | हवालदार | १ |
| १२ | शिपाई | ३ |
| १३ | सफाई कामगार | १ |
| | **एकूण** | **३१** |

Neelam Girish Sangwai

Digitally signed by Neelam Girish Sangwai
DN: CN = Neelam Girish Sangwai, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home Department
Date: 2020.03.30 11:37:39 +05'30'

**( नीलम संगवई )**
**कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**